सुधारित प्रशासकीय मान्यता
जुन्नर, जिल्हा पुणे येथे नवीन न्यायालयीन इमारत (तळ मजला + २ मजले) बांधण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
विधि व न्याय विभाग
शासन निर्णय क्र.सीसीबी-११२२/प्र.क्र.१९९/का-१३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०६ मार्च, २०२३

पहा :-

१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र. सीसीबी-१११७/प्र.क्र.१०७/का-१३, दिनांक ६ ऑक्टोबर, २०१८.
२) मा. प्रबंधक (निरिक्षणे-२), मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र.बी(डब्ल्यू) ६०५३/१९९१/(०१)/२३५१/४४९२५, दिनांक २२ डिसेंबर, २०२२.

प्रस्तावना :-

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये जुन्नर, जिल्हा पुणे येथे नवीन न्यायालयीन इमारत (तळमजला + २ मजले) बांधण्याकरिता रु.१३,७०,२९,०००/- इतक्या खर्चास मूळ प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. तद्नंतर उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ येथील मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या पत्रान्वये जुन्नर, जिल्हा पुणे येथे नवीन न्यायालयीन इमारत (तळमजला + २ मजले) बांधकामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला आहे. सदरहू प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय :-

जुन्नर, जिल्हा पुणे येथे नवीन न्यायालयीन इमारत (तळमजला + २ मजले) बांधण्याबाबतच्या रु.१५,७२,९६,०००/- (रुपये पंधरा कोटी बाहत्तर लक्ष शहाण्णव हजार फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशील | प्रशासकीय मान्यता रुपयात |
|---|---|---|
| १. | मूळ इमारत बांधकाम व पाणीपुरवठा खर्च | ९,२९,९५,५४२/- |
| २. | फर्निचर | १,१२,०१,५७३/- |
| ३. | भाववाढ | ४८,४९,२६१/- |
| ४. | अंतर्गत रस्ता | ६,८०,२१७/- |
| ५. | वाहनतळ | ११,६३,८९७/- |
| ६. | पेवींग ब्लॉक बसवणे | १०,७९,१४८/- |
| ७. | आकस्मिक खर्च | २१,३५,०००/- |
| ८. | वस्तू व सेवा कर | १,३५,००,३९२/- |
| ९. | मुख्य इमारतीची उर्वरित कामे | ७,५३,०४४/- |
| १०. | विद्युतिकरण | २,५८,३७,५००/- |
| ११. | विद्युतिकरणावरील जी.एस.टी. | ३१,००,५००/- |
| | **एकूण** | **१५,७२,९६,०७४/-** |
| | **म्हणजेच** | **१५७२.९६ लक्ष** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) बांधकाम सुरु करण्यापूर्वी नमूना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेवूनच सुरु करावे.

२) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र. बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

५) सदर काम सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या किमतीत पूर्ण करण्यात यावे.

६) अंदाजपत्रकीय कामात बदल करु नये.

७) सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियंता यांनी तोंडी दिलेल्या सूचनांच्या आधारावर कामाच्या व्याप्तीत बदल किंवा नवीन कामे समाविष्ट करु नयेत.

८) नवीन कामांचा समावेश करावयाचा झाल्यास किंवा व्याप्तीत बदल करावयाचा झाल्यास याबाबत लेखी आदेश प्राप्त करुन विहित मुदतीत व पध्दतीने सदर कामांना मंजूरी घेण्याची कार्यवाही करावी. अन्यथा संबंधित अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

९) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, सीव्हीसी तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

१०) आवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे व त्रुटींची पूर्तता करण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची असेल.

११) सदर सुधारित प्रशासकीय मान्यतेतील तांत्रिक बाबी निविदा विषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. अशास प्रकरणाची तपासणी त्यावेळेच्या प्रचलित शासन निर्णयानुसार करण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागची असेल.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च उपरोक्त कामासाठी "मागणी क्र. एच - ८, ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च - ०१, कार्यालयीन इमारती - ०५१, बांधकाम § कार्यक्रमांतर्गत - (०३) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना - राज्य हिस्सा) (०३) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम), ५३ - मोठी बांधकामे (४०५९ ०६७२) व (२१) न्यायादान (केंद्रपुरस्कृत योजना-केंद्र हिस्सा) (२१)(०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम), ५३ - मोठी बांधकामे (४०५९ १२२२)" या लेखाशिर्षाखाली मंजूर नियतव्ययातून खर्ची टाकण्यात यावा. मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक ०४/२०२३/ इमा-२ दिनांक ११ जानेवारी, २०२३ व वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक विआप्र-२०१३/ प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय

अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, अनुक्रमांक-९, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम विभाग पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०३०६१७३१३३४३१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2023.03.06 17:36:07 +05'30'

**( नितिन वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
४) मा. प्रबंधक बी (डब्ल्यू ) शाखा, मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
५) मा. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, पुणे.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक/दोन, मुंबई व नागपूर,
७) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
८) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे.
९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) विभाग, पुणे. (मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
११) कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१२) कक्ष अधिकारी, वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४) अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.
१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१६) कक्ष अधिकारी, का. ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१७) निवड नस्ती/संग्रहार्थ.